**जिल्हा परिषद सदस्यांना त्यांच्या कार्यक्षेत्रात विकास कामाच्या पाहणीसाठी राज्य मार्ग परिवहन सेवेच्या बसने फिरण्यासाठी जिल्हा परिषदेच्या स्वनिधीतून देण्यात येणा-या प्रवास भत्यात वाढ करणे तसेच पंचायत समिती सदस्यांनाही प्रवास भत्ता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

ग्राम विकास व जलसंधारण विभाग,
शासन निर्णय क्रमांक: टीआरए १०/२००२/प्र.क्र.२४१/पंरा-१
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- २८ मे, २००४

वाचा :-१) शासन निर्णय ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्र. टी.आर.ए. १०८९/६७२/(१०४)/०४, दि. ११/९/८९
२) शासन निर्णय क्र. प्रवास १०९०/१५३/(१६६)/०४, दि. ३१/५/९१
३) शासन निर्णय क्र. टी.आर.ए. १०९३/प्र.क्र.६६२/०५, दि. ८/६/९३

<u>प्रस्तावना</u> :

राज्यातील जिल्हा परिषद सदस्यांना त्यांचे कार्यक्षेत्रात स्थानिक विकासाच्या कामासाठी जनसंपर्क साधण्यासाठी त्यांना सध्या रुपये ४००/- इतका प्रवासभत्ता मिळतो. तथापि, पंचायत समितीच्या सदस्यांना असा प्रवास भत्ता मिळत नाही. शासनाच्या विविध योजना जिल्हा परिषदांकडे नव्याने वर्ग झाल्या असून समाजातील विविध घटकांना आरक्षणामुळे पंचायती राज संस्थाच्या कार्यात सहभागी होण्यास प्रवृत्त करण्यात येत असून त्यांना सहभागाची संधी उपलब्ध करुन देण्यात आलेली आहे. विकास कामावर देखरेख ठेवण्यासाठी लोकप्रतिनिधींना आपआपल्या कार्यक्षेत्रात वारंवार प्रवास करणे अत्यावश्यक असते. त्यामुळे त्यांना वाहन भत्ता मिळणे गरजेचे आहे. सध्याची महागाई व भाववाढ लक्षात घेता त्यांना मिळणारी प्रवास भत्ता अत्यंत अपुरा आहे. त्यामुळे बहुतांश जिल्हा परिषद सदस्यांनी प्रवास भत्यात वाढ करण्याबाबत शासनाकडे मागणी केली आहे. तसेच पंचायत समिती सदस्यांचीही त्यांनाही प्रवासभत्ता मिळावा अशी मागणी आहे. जिल्हा परिषद सदस्यांना दरमहा रु.४००/- इतका भत्ता त्यांचे कार्यक्षेत्रात एस्.टी.ने फिरण्यासाठी दिला जातो. तो वाढवून रु.१०००/- करण्याचा तसेच पंचायत समिती सदस्यांना प्रवास भत्ता दिला जात नाही, तो देण्यात यावा असा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

शासन निर्णय :

१. जिल्हा परिषदा व पंचायत समिती सदस्य यांच्या मागणीचा व राज्य मार्ग परिवहन सेवेच्या बसच्या प्रवास दरात झालेली वाढ या दोन्ही बाबींचा विचार करुन शासनाने जिल्हा परिषद सदस्यांना त्यांच्या कार्यक्षेत्रातील विकास कामांची देखरेख करण्यासाठी यापूर्वी मिळत असलेल्या प्रवास भत्यात रु. ६००/- ने वाढ करण्याचा निर्णय घेतला आहे. तसेच पंचायत समिती सदस्यांनाही प्रवास भत्ता देण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे. शासनाने घेतलेल्या निर्णयानुसार जिल्हा परिषद सदस्यांना यापुढे त्यांच्या जिल्ह्यातील कार्यक्षेत्रात एस.टी. बसने प्रवास करण्यासाठी दरमहा १०००/- रुपये व पंचायत समिती सदस्यांना त्यांच्या कार्यक्षेत्रात प्रवास करण्यासाठी दरमहा रु. ५००/- इतका प्रवास भत्ता अनुज्ञेय राहील.

२. सदर बाबीवर होणारा खर्च जिल्हा परिषदांनी त्यांच्या स्वनिधीतून भागवावा.

३. सदर आदेश दि. १/६/२००४ पासून अंमलात येतील.

४. हे आदेश वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. ५४१, व्यय-१५, दि. ३.९.२००३ अन्वये त्यांचे मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( कुंदा गोसावी )
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,
१) विभागीय आयुक्त (सर्व)
२)मुख्य कार्यकारी अधिकारी (सर्व)
३)महालेखापाल, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
४)महालेखापाल, महाराष्ट्र राज्य, नागपूर.
५)मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, नवी मुंबई.
६)उपमुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, नवी मुंबई, पुणे, नागपूर, औरंगाबाद, नाशिक, अमरावती.
७)ग्राम विकास व जलसंधारण विभागातील सर्व कार्यासने.
८)निवड नस्ती का. क्र. पंरा-१, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय.